**गणेश मंदिर, चारठाणा, जि. परभणी या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मंजुरी देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: स्मारके २०२४/प्र.क्र.८३/सां.का.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ मार्च, २०२४

**वाचा :** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.स्मारके २०२४/७४१, दिनांक २३.०१.२०२४ पत्र.

**प्रस्तावना:-**

मा. मंत्रिमंडळ विशेष बैठक छत्रपती संभाजीनगर येथे दिनांक १६.०९.२०२१ रोजी पार पडली होती. त्यामध्ये घेण्यात आलेल्या निर्णयामध्ये मराठवाडा विभागातील ऐतिहासिक वास्तुंचे संवर्धन करण्याचा समावेश करण्यात आला असून विशेषत: त्यामध्ये चारठाणा, जि.परभणी येथील प्राचीन वास्तुस्थळाचा विकास करण्याबाबत घोषणा करण्यात आली आहे. मा.मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानुसार **गणेश मंदिर, चारठाणा, जि. परभणी** या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामाचे रु.१,६२,५८,८८८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्रान्वये केली आहे. त्यानुसार या स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या रु.१,६२,५८,८८८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

०१. या शासन निर्णयान्वये **गणेश मंदिर, चारठाणा, जि. परभणी** या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या रु.१,६२,५८,८८८/- (अक्षरी रूपये एक कोटी बासष्ट लाख अठ्ठावन्न हजार आठशे अठ्ठ्याऐंशी मात्र ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. या साठी होणारा खर्च मागणी क्र झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) २२०५ १३०२ २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षात त्या त्या वर्षी उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची राहील.

०४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ६ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१७२६५०५२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.12 17:38:46 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (सां.का.), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, नांदेड
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
महालेखापाल-१, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
अवर सचिव (अर्थसंकल्प),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, सां.का.३